**लोकप्रतिनिधी, इतर मान्यवर व नागरिकांकडून मा. मुख्यमंत्री यांना पाठविलेल्या निवेदने / पत्रे यावरील कार्यवाही.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण- २०१५ / प्र. क्र. १०० / १८ ( र. व का. )**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १० सप्टेंबर, २०१५

**परिपत्रक :**

मा. मुख्यमंत्री यांच्याकडे लोकप्रतिनिधी, इतर मान्यवर व सर्वसाधारण नागरीक यांच्याकडून अनेक पत्र / निवेदने प्राप्त होत असतात. प्रशासनात गतीमानता आणण्याकरीता अशा निवेदन / पत्रावरील शेऱ्यानुसार कार्यवाही संदर्भात पुढीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत.

लोकप्रतिनिधी, इतर मान्यवर आणि सर्वसाधारण नागरिकांच्या निवेदनावर मा. मुख्यमंत्री यांनी दिलेल्या शेऱ्यासंदर्भात पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :-

**(अ) सर्वसाधारण पत्रावरील कार्यवाही :-**

| | | |
|---|---|---|
| अ. | ज्या पत्रांवर प्रचलित नियमाप्रमाणे कार्यवाही करणे शक्य असेल, अशी निवेदने / पत्रे. | संबंधित विभागाचे मंत्री व मा. मुख्यमंत्री यांच्याकडील विषयांच्या बाबतीत संबंधित राज्यमंत्री, यांची मान्यता घेऊन निर्णय घेण्यात यावा व तसे संबंधित लोकप्रतिनिधी, मान्यवर, सर्वसाधारण नागरिक यांना कळविण्यात यावे, त्याचा अहवाल मुख्यमंत्री सचिवालयातील विशेष कार्य कक्षास पाठविण्यात यावा. |
| ब. | धोरणामध्ये बदल करणे आवश्यक असेल तर अशा प्रकरणांचे प्रस्ताव | मुख्य सचिव यांच्यामार्फत सकारण प्रस्ताव मा. मुख्यमंत्री यांना सादर करण्यात यावेत. |

**(ब) बदली / नियुक्ती संदर्भातील पत्रे असतील तर, त्याबाबत पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.:-**

१. बदली अधिनियमानुसार निश्चित केलेले सक्षम प्राधिकारी, तसेच बदली अधिकार प्रत्यावर्तीत केल्याप्रमाणे बदली करण्यास सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेऊन असे प्रस्ताव हाताळण्यात यावेत.

२. ज्यांची बदली करणे शक्य आहे, अशा प्रस्तावांवर बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने प्रकरण निकाली काढावे.

३. जेथे बदली करणे शक्य नाही, असे प्रस्ताव सकारण मा. मुख्यमंत्री यांना सादर करावे.

४. वरीलप्रमाणे कार्यवाही ही फक्त नियतकालिक (एप्रिल/मे) बदल्यांसाठीच लागू राहील.

५. एप्रिल / मे व्यतिरिक्त च्या कालावधीत बदली अधिनियमातील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने बदली करण्याचे प्रस्ताव हाताळण्यात यावेत.

वरीलप्रमाणे सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी तत्परतेने कार्यवाही करावी, त्याचप्रमाणे त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालयीन प्रमुख यांच्या निर्दशनास सदर निर्देश आणावेत व त्यानुसार कार्यवाही करण्याचे निर्देश द्यावेत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेताक २०१५०९१११५४९४६५९०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swadheen S Kshatriya

Digitally signed by Swadheen S Kshatriya
DN: c=IN, o=All India Service, ou=Chief Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Swadheen S Kshatriya
Date: 2015.09.11 16:04:34 +05'30'

**( स्वा. शि. क्षत्रिय )**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२) सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,
३) मा. राज्यपालांचे सचिव ( ५ प्रती ),
४) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव ( ५ प्रती ),
५) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
६) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
७) मा. महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य,
८) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
९) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
१०) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
११) प्रबंधक , लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय,

१२) सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१३) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१४) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१५) मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
१६) सर्व विभागीय आयुक्त,
१७) सर्व जिल्हाधिकारी,
१८) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१९) सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख /
२०) प्रादेशिक प्रमुख / कार्यालय प्रमुख,
२१) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई ( ५ प्रती ),
२२) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२३) निवड नस्ती ( कार्यासन १८ ).